अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी/सांख्यिकी अधिकारी, इत्यादी, गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील पदावर <u>पदोन्नतीने दिलेली नियुक्ती नाकारल्याबाबत</u>

# महाराष्ट्र शासन

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पदोनि-१२१६/प्र.क्र. १४१/का. १४२७**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २७ फेब्रुवारी, २०१७

**संदर्भ :-** १) या विभागाचे समक्रमांकाचे दि. १०.११.२०१६ चे आदेश.

२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसआरव्ही १०८७/ ११३१/प्र.क.११-८९/बारा, दि. ३०/०४/१९९१

**<u>शासन आदेश</u>**

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन सहायकांना उपरोक्त संदर्भाधिन क्रमांक १ च्या कार्यालयीन आदेशान्वये संशोधन अधिकारी / सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित) या संवर्गामध्ये पदोन्नती देण्यात आली होती. सदर आदेशामधील खालील संशोधन सहायकांनी पदोन्नती नाकारली असल्याने, त्यांचे नांव संदर्भ क्र. २ च्या सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयानुसार पदोन्नती आदेशातून वगळण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **उमेदवाराचे नांव** | **दिनांक १० नोव्हेंबर, २०१६ रोजीच्या आदेशातील अनुक्रमांक** |
|---|---|---|
| **(१)** | **(२)** | **(३)** |
| १ | श्री. दे. का. तुपे | १८ |

२. संदर्भाधिन सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक ३०/०४/१९९१ मध्ये “पदोन्नती नाकारल्यामुळे उद्भवणारे परिणाम व त्याबाबत अवलंबविण्याची कार्यवाही” याबाबत पुढीलप्रमाणे तरतूद केली आहे :-

> “वरच्या संवर्गात पदोन्नतीसाठी निवड झाल्यानंतर एखाद्या सेवकाने पदोन्नतीचे पद स्विकारण्यास नकार दर्शविल्यास त्याचे नांव पदोन्नतीसाठी पात्र असणाऱ्या सेवकांच्या निवड यादीतून काढून टाकण्यात यावे. पदोन्नतीसाठी पात्र असणाऱ्या कर्मचाऱ्यांची निवड यादी त्यानंतर जेव्हा बनविण्यात येईल, त्यावेळी त्या कर्मचाऱ्याच्या प्रकरणाचा गुणवत्तेप्रमाणे पुन्हा विचार करावा.”

उपरोक्त परिच्छेद क्रमांक १ मध्ये नमूद केलेल्या कर्मचाऱ्यांनी पदोन्नती नाकारल्यामुळे त्यांचेबाबत सदरहू तरतूद लागू होते. तरी त्यानुसार उचित कार्यवाही संचालनालय स्तरावरुन करण्यात यावी.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. वेतन-११०९/प्र.क्र.४४/सेवा-३, दिनांक १ एप्रिल, २०१० अन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करण्यात आली आहे. उपरोक्त कर्मचाऱ्यांनी पदोन्नती नाकारली असल्याने, जर त्यांना आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्यात आला असेल तर वित्त विभागाच्या दिनांक १ एप्रिल, २०१० रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक ३ नुसार उचित कार्यवाही संचालनालय स्तरावरुन करण्यात यावी.

४. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२२७११४९३२९२१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2017.02.27 15:53:11 +05'30'

**( प्रियांका रं. छापवाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर.
३. मा. मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, अहमदनगर /चंद्रपूर
१०. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग (का.१२/का.१६-ब), मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२. संबंधित कर्मचारी *
* संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सदरहू आदेश संबंधित कर्मचाऱ्यांना द्यावेत, ही विनंती.
१३. निवड नस्ती (का. १४२७)